(6)

GR-200407191330050001-2500

एकात्मिक बाल बाल सेवा योजने-
अंतर्गत कार्यरत अंगणवाडो कार्यकर्ती
मदतनीस यांना सुट्टया/रजा देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

महिला व बाल विकास विभाग

शासन परिपत्रक क्रमांक - 31/ 2001/ एबावि 2001/ प्र क्र 28/ का 6

नवीन प्रशासन भवन, 3 रा मजला,

मंत्रालय, मुंबई -400 032.

दिनांक : - 5 मार्च 2001

**वाचा -** शासन परिपत्रक ग्रामविकास विभाग क्रमांक आयसीडी-1089/सीआर 1568/47, दिनांक 31 मे 1989.

**शासन परिपत्रक-** एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत कार्यरत अंगणवाडो कार्यकर्ती व मदतनीस यांना अनुज्ञेय असणा-या सुटटयामध्ये कपात केली असल्याची तक्रार अंगणवाडो कर्मचारी सभा (महाराष्ट्र), मुंबई यांनी शासनाकडे केली आहे.त्यास अनुसरुन शासन असे आदेश देत आहे की,एकात्मिक बाल विकास सेवा या केंद्र पुरस्कृत योजने अंतर्गत कार्यरत अंगणवाडो कार्यकर्ती व मदतनीस या मानधनी सेविका आहेत.ही योजना केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनानुसार राज्यामध्ये राबविली जाते. यास्तव अंगणवाडो कार्यकर्ती व मदतनीस यांना एका कॅलेंडर वर्षासाठी किती सुटटया/रजा देण्यात याव्यात याबाबतचे आदेश संदर्भाधिन ग्राम विकास विभाग,शासन परिपत्रक दि.31 मे 1989 अन्वये देण्यात आलेले आहेत.अंगणवाडो कार्यकर्ती व मदतनीस या नियमित आस्थापनेवरील कर्मचारी नसल्यामूळे त्यांना अनुज्ञेय असणा-या रजा/सुटटया केंद्र शासनाच्या धोरणाप्रमाणेच राहणार असल्यामुळे त्यामध्ये कोणताही फेरबदल करण्यात येवू नये.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[वि. रा. वेदपाठक]
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना आयुक्तालय, कोकण भवन,नवी मुंबई
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बाल कल्याण)
सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी, एकात्मिक बाल विकास सेवा योजना.
आयुक्त , महिला व बाल कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी, का-5 महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती, कार्यासन- 6

G.R.Format